# लोकमान्य

जन्म – २३ जुलै १८५६

मृत्यु – १ ऑगस्ट १९२०

## बाळ गंगाधर टिळक

**स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे आणि तो मी मिळवणारच !**

महाराष्ट्राच्या ह्या जहाल 'केसरी' ला निर्भीड अक्षरी चे कोटी कोटी वंदन !




: **संपादक** :

सचिन काकडे (मुंबई)

: **सह संपादक** :

सोनाली घाटपांडे (पुणे)

स्वप्ना कोल्हे (नाशिक)

भारती सरमळकर (मुंबई)



**ई-साहित्य प्रकाशन**

वर्ष दुसरे, अंक २२

दिनांक : १ ऑगस्ट २०१०

# लोकमान्य



## देशभक्ताची देवपुजा.....

लोकमान्य टिळक एकदा काही कामानिमित्त आपल्या ओळखीच्या गृहस्थाच्या घरी गेले.

त्या गृहस्थांच्या पत्नी आपल्या मुलाला म्हणाल्या "गजू ! अरे देवपुजा करायाचा कसला रे कंटाळा?" गजू हळुच आईला म्हणाला, आई, तुला एक महत्वाची गोष्ट सांगतो.

अगं लोकमान्य टिळक हे सुध्दा देवाला मानतात परंतु ते आपला वेळ देवपुजा करण्यासाठी घालवीत नाहित !.

गजूची आई रागावली व म्हणाली 'मुर्ख मुला, तु आपली तुलना त्यांच्याशी कुठे करतोस ? ते कुठे अन तु कुठे ? अगं आई, तुलना त्यांच्याशी करत नाही फ़क्त ते देवपुजेत वेळ घालवित नाहि असं म्हणतोय.!! गजू म्हणाला. अरे, तुला नीट माहित नसेल लोकमान्य पुजा करतात कि नाहि ते. उगाच काहीतरी बोलु नकोस !! आई म्हणाली. 'मग आई, आज अनायसे ते आपल्या घरी आले आहेत. मी त्यांनाच विचारुन खात्री करुन घेतो.'

गजू आईला म्हणाला आणि लोकमान्यांजवळ गेला व त्याने विचारले...

"काका ! आपण देवाची पुजा करता का?

लोकमान्य म्हणाले, हो ! अगदी रात्रंदिवस.

'कोणत्या देवाची?' गजूने विचारले.

त्याबरोबर त्यांच्यासमोर त्या दिवानखाण्यात जो भारताचा नकाशा लावला होता त्याकडे बोट दाखवुन लोकमान्य म्हणाले, "या माझ्या मातृभुमीची."

संपादकीय

# लोकमान्य

नमस्कार मित्रहो ......

१ ऑगस्ट हा लोकमान्य बाळ गंगाधर टिळकांचा स्मृतीदिन. स्वातंत्र्यसंग्रामात **"भारतीय असंतोषाचे जनक"** ठरलेले लोकमान्य टिळक भगवद्‌गीतेचे आधुनिक भाष्याकार आणि प्राच्यविद्या पंडीत. त्यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातल्या 'चिखली' इथला. **"केसरी"**, **"मराठा"** ही वृत्तपत्रे, तर. . **गीतारहस्य, ओरायन, श्रीमदभगवद्‌गीता रहस्य, कर्मयोगशास्त्र** हे त्यांनी लिहिलेले ग्रंथ.

हिंदुंमध्ये राष्ट्ररक्षण आणि धर्म संस्कृतीबद्दल जागृती आणणे, त्यांच्यात संघटितपणाची भावना आणणे त्यांना अन्यायाविरुध्द व राष्ट्रविघातक शक्तीविरुध्द लढण्यास प्रवृत्त करणे, त्यांच्यातील सुप्त सामर्थ्याची त्यांना जाणीव करुन देणे या उद्देशातुनच **"सार्वजनिक गणेशोत्सव"** आणि **"शिवजयंती"** अश्या उत्सवांची सुरुवात. याच उत्सवांत भजत, किर्तन, पोवाडे, यांमार्फ़त युवा पिढीला भारतीय संस्कृतीच्या अंगोपांगाचा परिचय करुन देण. तसेच समाजप्रबोधन व लोकशिक्षणासाठी तत्कालीन समस्यांवर विविध मान्यवरांचे परीसंवाद आणि व्याख्यान घडवुन आणण. एकजुटीसाठी राष्ट्रभावना प्रखर करण्यासाठी त्यांनी काय केर्ले . लोकमान्य टिळकांनी सुरु केलेल्या गणेशोत्सवाचे फ़लित म्हणजे तत्कालीन समाज धर्म व राष्ट्र यांबद्दल जागृत होऊ लागला या उत्सवातुन स्फ़ुर्ती घेऊन कित्येकांनी स्वातंत्र्यसंग्रामात उड्या घेतल्या. आजही त्यांचा हा विडा सर्व सार्वजनिक मंडळांच्या कार्यकत्यांनी उचलुन धरलेला आहे. लोकमान्य टिळकांनी मांडलेल्या शाश्वत मुल्यांचे तेज अजुनही चमकत आहे. टिळकांनी चाळीस वर्ष खपुन या भुमीत लोकशाहिचा भक्कम पाया घातला. टिळाकांवरील ऐतिहासिक खटल्याचा निकाल लागल्यानंतर त्यांना गुप्तपणे मंडाले इथल्या तुरुंगवासात नेण्यात आले तेथे सहा वर्षाच्या दारुण एकांतवासात बौध्दिक परिश्रम घेऊन **"गीता-रहस्य"** हा जगाला थक्क करुन सोडणार ग्रंथरुपी चमत्कार करुन त्यांनी कर्मयोग सांगितला.

१८८१ ते १९२० या चाळीस वर्षांच्या काळात टिळकांनी केसरी आणि मराठा या वृत्तपत्रांतुन ५१३ अग्रलेख लिहिले "सरकारचे डोके ठिकाणावर आहे काय"?, 'उजाडले पण सुर्य कुठे आहे'? 'टिळक सुट्ले पुढे काय' ? 'प्रिन्सिपॉल', 'शिशुपाल कि पशुपाल'?, 'टॊणग्याचे आवळ', 'हे आमचे गुरुच नव्हेत', 'बादशहा ब्राम्हण झाले', हे त्यांचे त्या काळचे प्रसिध्द अग्रलेख. टिळकांचे स्पष्ट आणि पखरड वक्तृत्व केसरी आणि मराठा मधील अग्रलेखातुन आले. टिळक खगोलशास्त्राचे गाढे अभ्यासक आणि स्वातंत्र संग्रामी परखड व थेट वक्तेपणा असलेले, **जहाल** मतवादी नेते. मातृभुमीस **"आई"** म्हणणा-या आणि **ज्यांनी घडविला महाराष्ट्र** या पंक्तित वसणा-या या थोर क्रांतिकारकास..

***आज त्यांच्या ९० व्या पुण्यतिथीनिमित्त नेटाक्षरी तर्फ़े कोटी कोटी वंदन !!!***

**सचिन काकडे**
(संपादक) - मुंबई

# लोकमान्य



## हा असा गर्जतो .....

हा असा गर्जतो आवाज  अजुन  मेघात
एक थोर वीर जन्मला याच देशात
**“ स्वराज्य माझा जन्मसिध्द हक्क आहॆ आणि तो मी मिळवणारच..!!”**
हि अशी रणभुमीस हाक धुमसता अजुनी
आजही नसांनसातुन धावत सुटतो अग्नी
या भारतभुमीला केव्हाच मानले जननी
हा तिला वाहिला जन्म  अमर वरदानी
हा तिच्याचसाठी आलो आज रणात...!!
हा असा गर्जतो आवाज  अजुन  मेघात...!!

तव राष्ट्रधर्म रक्षिण्या तपस्वी आला
‘केसरी’, ‘मराठा’ हातात घेतला भाला
भेदुन काढली राष्ट्रविघातक शक्ती
संघटीत केले राष्ट्र अन, राष्ट्रभक्ती
हा कृष्ण तोच हा नवीन गीता वाला
गीता-रहस्यही सहज सांगता झाला
कर्मयोग, कर्तव्यधर्म  पेटवा मनां-मनात
हा असा गर्जतो आवाज  अजुन  मेघात...!!

हा जहाल मतांचा युवा पिढीचा नेता
स्वातंत्र्यसंग्रामी अभ्यासक प्रणेता
जनी-मनी जागविले सुप्त सामर्थ्य
जात-वर्ण- भेद सांगितले, आहे व्यर्थ
एकजुट व्हा !! तव असे आवाहन झाले
गण-गणनायक अन शिवबा पुन्हा आले
या मातीत, या देशात, संस्कृतीच्या उत्सवात...!!
पुन्हा पुजा रे माय मराठी अपुल्या या  ह्रदयात...!!
हा असा गर्जतो आवाज  अजुन  मेघात...!!

**सचिन काकडे**

# लोकमान्य



## नरसिंह गरजला.....

नरसिंह गरजला
अखंड हिंदुस्थान...
पुन्हा एकदा, थरथरला
अधिकार स्वराज्याचा हवा
नरसिंह गरजला. . . ।।

'बुध्दी'-'बळा' चा महारथी हा
समजु नका हो 'बाळ'
कधी ना होतो अस्त अशा
सुर्याची संध्याकाळ
शिवजन्माचा उत्सव झाला
भगवा फ़डकला
अधिकार स्वराज्याचा हवा
नरसिंह गरजला. . . ।।

जहाल शब्दांचा हा तारा
केसरी आभा ही त्याला
पंजाब, सिंध, गुजरात, मराठा,
बंगाल पेटता केला
एकजुटीसाठी भक्तांच्या
मंगलमुर्ती अवतरला
अधिकार स्वराज्याचा हवा
नरसिंह गरजला. . . ।।

नव्या पिढीचे अर्जुन शोधत
मशाल देतो हाती
रहस्य गीतेचे उलगडती
क्रुर कातळी भिंती
लोकमान्यतेच्या श्वासातुन
वणवा ही धगधगला
अधिकार स्वराज्याचा हवा
नरसिंह गरजला. . . ।।

**मंदार चोळकर**
मुंबई



सार्वजनिक

गणेशोत्सव

व

शिवजयंती

सुरु करणारा

स्वातंत्र्य

योद्धा



# लोकमान्य



मराठी बाणा.....

तो खास
पुणेरी थाट
मराठी बाणा...!!
नवलाख
वायुघात
उरी पडताना !!

शर कापुन उठती लाख
पाहुनी नजरा,
झुके लाख फ़िरंगी मान
झाडती मुजरा,
ही अशी
बुध्दीची वीज
कडाडताना...!!
तो खास
पुणेरी थाट
मराठी बाणा...!!

तेज वाणीचे
सरस्वतीसम भासे
वाक्यात नाचती
विखार खास-म-खासे
वक्तृत्व खेळते
युध्द
बागडताना...!!
तो खास
पुणेरी थाट
मराठी बाणा...!!

लाखाची सेना
नाव "टिळक" हे साचे
लेखणीत नांदतो रुद्र
सरस्वती नाचे
नजरेत बांधुनी
विचार
वावरताना...!!
तो खास
पुणेरी थाट
मराठी बाणा...!!

थरथर कापवी अवनी
केसरी लेख,
उभी सभा जिंकतो
हा ही याची मेख,
गितेस सांगती
रहस्य
उलगडताना...!!
तो खास
पुणेरी थाट
मराठी बाणा...!!

मकरंद सखाराम सावंत
मुंबई

# टिळक – कुटुंबियांसमवेत



# लोकमान्य

## अस्सल टिळक

मुर्तीकाराच्या अडगळ खोलीमध्ये नाकारलेल्या / भंगलेल्या काही मुर्त्या पडलेल्या आहेत, त्यातील टिळकांच्या एका मुर्तीचे स्वगत.



मी ही ऐकवली असती गोष्ट. . .

चिखलामधल्या कमळाची,
केसरी जहाल मथळयांची,
उत्सवातल्या छुप्या भाषणांची,
पगोट्यावरल्या वळयांची.

मी ही दाखवली असती गंमत. . .

लेखणीच्या थरथरत्या टोकाची,
ठीकाणावर नसणा-या डोक्यांची,
जरबबंद ओठांची अन,
काळीज चिरणा-या डोळयांची.

मी ही वाचली असती यादी. . .

प्लेग पसरल्या दुःखाची,
मंडालेतील धक्क्यांची,
टरकलागत कचरा गो-यांची अन,
जन्मसिध्द हक्कांची.

मी ही उलगडली असती पानं. . .

रहस्य दडल्या गीतेची,
स्वराज्याच्या(पायाभरणीची) विटेची,
पिळदार निधड्या छातीची अन,
फ़िरंगीयांच्या रचल्या चितेची.

पण. . .

मुर्तीकाराच्या छिन्निघावाने,
मज पडली नकोशी भेग नवी,
लोकमान्यतेची माती मुळात
कणखर अन भरीव हवी.

**प्राजक्त देशमुख**
नाशिक

# लोकमान्य



## अवतार.....

खुप केलात टिळक आता आणखी एक करा . . .!!
षंढ झालोय आम्ही तुम्हीच आता अवतरा . . .!!

इतिहास आता पुस्तकांपुरता
आणि तुम्ही पुतळ्यांपुरते राहिलात. . .
या दगडांसाठी तुम्ही,
स्वराज्याचं स्वप्न पाहिलात. . ?

शेंगा खाणारे आजही टरफ़ले टाकतात
आणि न खाणारेच वाकतात. . .
एकात्मता बघा आमची
गल्ली-गल्लीला गणपति लागतात. . .

तुमच्या जन्म सिध्द हक्काला
आज किंमत राहिली नाही. . .
खरच सांगतो टिळक
मंडालेची भिंत, कुणीच पाहिली नाही. . .

तुमची आठवण येते टिळक
फ़क्त बॅनर लावण्यापुरती. . .
आणि आमचेच फ़ोटो असतात
ढीगभर, तुमच्या वरती. . .

एवढं मात्र करा टिळक
झेंडा बघुन खाली उतरा. . .
आपला नाही राहिला आता
तो हिमालयाचा कतरा. . .

तुम्ही येउन बघा तरी
खरंच आता आझ़ाद आहे देश. . .
गंगा आणि सिंधु मध्ये
फ़क्त आडवी आलीये रेष. . .

फुगत आहेत बुरुज खॉटे
हे सोनेरी गज वाकवा. . .
भगव्या आणि केशरी मधला
तो फ़रक तेवढा दाखवा . . .

खुप केलात टिळक आता आणखी एक करा . . .!!
षंढ झालोय आम्ही तुम्हीच आता अवतरा . . .!!

**सुधीर मुळीक**
मुंबई

# !! स्वराज्य !!

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

------------------------

ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-साप्ताहिके

ई-स्टाप, स्वरनेटाक्षरी ऑडियो अल्बम, बालनेटाक्षरी

प्रसिद्ध झालेली ई-बुक्स

टल्लीची शाळा, मकरंदच्या त्रिवेण्या, ग्रेव्हयार्ड लिटरेचर, चार क्षण, तो आणि ती, प्रियेचे अभंग, देशी दारुचे दुकान-3D, ई-शाळा, तो, मी आणि सिगरेट

------------------------


वरील ई-बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

**esahity@gmail.com**

नेटाक्षरीचा हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

**netaksharee@gmail.com**